**व्यवसाय शिक्षणाच्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाच्या संधी उपलब्ध करण्याकरिता उपाययोजना करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक: व्हीओसी-२०११/१९/प्र.क्र.११/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनाक : २७ जानेवारी, २०११

**प्रस्तावना :-** देशाच्या आर्थिक प्रगतीमध्ये व्यवसाय शिक्षणास अनन्य साधारण महत्व प्राप्त झाले आहे. ही काळाची गरज ओळखून राज्य शासनाने व्यवसाय शिक्षणाच्या उन्नतीच्या अनेक योजना हाती घेतल्या आहेत. सद्या आंतरराष्ट्रीय स्पर्धेत टिकून राहण्यासाठी औद्यागिक क्षेत्राला निष्णात कामगार वर्गाची गरज असुन त्यासाठी व्यवसाय शिक्षणाचा दर्जा उंचावणे आवश्यक आहे.

सध्या व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण विद्यार्थ्यांना पुढील शिक्षणाच्या संधी अल्प प्रमाणात उपलब्ध असल्यामुळे अशा विद्यार्थ्यांची कुंठीतता घालवून भविष्यात त्यांना रोजगाराच्या संधी उपलब्ध करून देणे क्रमप्राप्त आहे. व्यवसाय शिक्षणाचा प्रसार प्रभावीपणे व्हावा, यासाठी माध्यमिक व उच्च माध्यमिक स्तरावर व्यवसाय शिक्षणाचा अंतर्भाव करुन विद्यार्थ्यांमध्ये त्याबद्दल आवड निर्माण करण्याचा राज्य शासनाचा मानस आहे. त्यासाठी स्वतंत्र व्यवसाय शिक्षण विद्यापिठाची स्थापना करणे किंवा पारंपारीक विद्यापिठामध्ये व्यवसाय अभ्यासक्रमाचा अंतर्भाव करणे या बाबींवर शासन विचार करत आहे. यासाठी या क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती व शासकीय आधिकारी यांची एक संयुक्त समिती गठीत करण्याबाबतचा प्रस्तावही शासनाच्या विचाराधिन आहे. त्या अनुषंगाने समिती गठीत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

२. व्यवसायीक अभ्यासक्रम उत्तीर्ण विद्यार्थ्यांना त्याच विद्याशाखेत पदवी/पदव्युत्तर व त्या पुढील शिक्षणाच्या संधी उपलब्ध व्हाव्यात याकरिता व्यवसाय शिक्षण विद्यापिठाची स्थापना करणे किंवा पारंपारीक विद्यापिठांमध्ये व्यवसाय अभ्यासक्रमाचा अंतर्भाव करणे, यासाठी शासनास योग्य शिफारशी करण्याकरिता पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नांव | |
|---|---|---|
| १ | श्रीमती. स्वाती मुजुमदार, प्रधान संचालिका, सिंबॉयसिस ओपन एज्यु. सोसायटी, पुणे (इंडिया) | अध्यक्षा |
| २ | डॉ. व्ही.एस.प्रसाद, माजी संचालक, NAAC माजी कुलगुरु बीआरओयु, हैदराबाद. | सदस्य |
| ३ | श्री.दिलीप शेनॉय, सी.ई.ओ., नॅशनल स्कील डेव्होलोपमेंट कॉपोरेशन, नवी दिल्ली. | सदस्य |
| ४ | श्री.प्रदीप भार्गव, एम.डी.कमिन्स जनरेटर टेक्नॉलॉजिस इंडिया लि., पुणे. | सदस्य |
| ५ | डॉ.शकुंतला कात्रे, माजी सल्लागार, एन.ए.ए.सी.बंगलोर | सदस्य |
| ६ | संचालक, (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई-१ | सदस्य |
| ७ | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ, मुंबई | सदस्य |
| ८ | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण परिक्षा मंडळ, मुंबई | सदस्य |
| ९ | श्री. रविंद्र बाळापुरे, उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, औरंगाबाद | सदस्य |
| १० | श्रीमती. सरदेसाई, निवृत्त अध्यक्ष, उच्च व माध्यमिक शालांत परिक्षा मंडळ, पुणे. | सदस्य |
| ११ | प्र.संचालक (व्य.शि.), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई-१ | सदस्य सचिव |

३.  प्रस्तुत समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील : -

१) व्यवसाय शिक्षणाचा प्रसार करण्याकरिता राज्यामध्ये स्वतंत्र व्यवसाय शिक्षण विद्यापीठ स्थापन करावे, जेथे +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रम, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ इत्यादींचे व्यवसायिक अभ्यासक्रम पास झालेल्या विद्यार्थांना त्यांच शाखेमध्ये पदवी, पदव्युत्तर इत्यादी अभ्यासक्रम पूर्ण करता येतील किंवा पारंपारीक विद्यापीठामध्ये बीएससी, बीकॉम, बीएससी कृषी इत्यादी उच्च शिक्षण अभ्यासक्रमाप्रमाणे व्यावसायिक पदवी देणारे व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करावे, जेणेकरून विद्यार्थ्यांना पदवीनंतर पदव्युत्तर पदवी तसेच पीएचडी करीता ही सोयी/संधी उपलब्ध करणे ही बाब तपासून शासनास शिफारस क्ररणे.

२) राज्यातील व्यवसाय शिक्षण देणा-या संस्थाचे मूल्यमापन व मुल्यांकन करण्याबाबत शिफारशी करणे.

३) सध्या अस्तित्वात असलेल्या उच्च माध्यमिक व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रम (HSC Vocational Education) प्रमाणे एस.एस.सी. व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रम सुरु करण्याची आवश्यकता इ.बाबी तपासणे.

४) व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विद्यार्थांना Lateral/Vertical Mobility उपलब्ध करण्याच्या दृष्टीने योजना / आराखडा तयार करणे.

५) क्रेडिट बँकिंग व ट्रान्सफर सिस्टीम संबंधी आराखडा तयार करणे.

६) महाराष्ट्र व्यवसाय शिक्षणाचे धोरण ठरविणे, व शैक्षणिक पात्रता आणि समकक्षतेबाबत आराखडा तयार करणे. त्याच प्रमाणे हे करतांना केंद्र शासनाकडून नजिकच्या काळात तयार होणारे NVEQF धोरण स्विकृत करण्याकरिता राज्यात आवश्यक ती प्राथमिक तयारी करण्यासाठी शिफारशी सुचविणे.

७) महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळाचे अभ्यासक्रम हे सद्यस्थितीतील उद्योग/आस्थापनाना लागणा-या तंत्रज्ञानशी निगडीत आहेत काय ? नसल्यास त्यात सुधारण सुचविणे. राज्यातील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाचा दर्जा इतर राज्याच्या +२ स्तरावरील व्यवसायीक अभ्यासक्रमाशी तुलना करून त्याचा दर्जा निश्चित करणे.

४.  गठित समितीने उपरोक्त मुद्यांवर सविस्तर अभ्यास करून त्याबाबतच्या सविस्तर व स्वयंस्पष्ट शिफारशी व अहवाल २ महिन्यात शासनास सादर करावा. अध्यक्षांच्या सहमतीने समितीच्या बैठका आयोजित करणे, विषयसूचि तयार करणे, इतिवृत्त तयार करणे आणि अंतिमत: अहवाल तयार करण्याची जबाबदारी सदस्य सचिवांची राहील.

५.  या समितीच्या बैठकीसाठी होणारा खर्च महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळाच्या स्वीय प्रपंची लेख्यांमधील उपलब्ध निधीतून करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणकीय सांकेतांक क्रमांक :२०११०१२८१७०७३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( सीमा ढमढेरे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव

D:\Patki\G.R\VE.UNIVERSITY

३) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव
४) मा.सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव
५) श्रीमती. स्वाती मुजुमदार, प्रधान संचालिका, सिंबॉयसिस ओपन एज्यु. सोसायटी, पुणे (इंडिया)
६) डॉ. व्ही.एस.प्रसाद, माजी संचालक, NAAC माजी कुलगुरु बीआरओयु, हैदराबाद.
७) श्री.दिलीप शेनॉय, सी.ई.ओ., नॅशनल स्कील डेव्होलोपमेंट कॉपोरेशन, नवी दिल्ली.
८) श्री.प्रदीप भार्गव, एम.डी.कमिन्स जनरेटर टेक्नॉलॉजिस इंडिया लि, पुणे.
९) डॉ.शकुंतला कात्रे, माजी सल्लागार, एन.ए.ए.सी.बंगलोर.
१०) संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई.
११) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ, मुंबई
१२) श्री. रविंद्र बाळापुरे, सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, औरंगाबाद.
१३) अध्यक्ष, उच्च व माध्यमिक शालांत परिक्षा मंडळ, पुणे.
१४) श्रीमती. सरदेसाई, निवृत्त अध्यक्ष, उच्च व माध्यमिक शालांत परिक्षा मंडळ, पुणे.
१५) प्र.संचालक, (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
१६) सह सचिव (व्यवसाय शिक्षण) यांचे स्विय सहाय्य.
१७) निवड नस्ती (व्यशि-४)